**अतिवृष्टीमुळे आलेल्या पुरामध्ये नाल्यांलगत वसलेल्या झोपडपट्टीवासीयांच्या संरक्षणार्थ संरक्षक भिंतीचे बांधकाम करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक- संकीर्ण - २०२३/प्र.क्र.८२/झोपनि-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १० जुलै, २०२३.

संदर्भ : - गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय क्रमांक पुनर्व-२०१०/प्र.क्र.१६२ (अ)/झोपनि-२, दि. ४ मार्च, २०१५

**प्रस्तावना :-**

या विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन दिनांक ४ मार्च, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये बृहन्मुंबईतील डोंगर उतारावरील/धोकादायक दरडीखाली राहणाऱ्या झोपडपट्टीवासीयांच्या संरक्षणार्थ संरक्षक भिंती बांधण्याबाबत मार्गदर्शक सूचना देण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार केवळ ९ मीटर उंचीपर्यंतच्या संरक्षण भिंती बांधण्याचे काम मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळाकडून कार्यन्वयीन यंत्रणा म्हणून करण्यात येते व त्यासाठी नियोजन विभागामार्फत परस्पर सुधार मंडळास निधी उपलब्ध करुन दिला जातो. तसेच ९ मीटरपेक्षा जास्त उंचीच्या संरक्षण भिंती बांधण्याचे काम सार्वजनिक बांधकाम विभाग किंवा अन्य सुयोग्य यंत्रणेकडून करुन घेण्यात येते. सदर शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचना क्रमांक ६ पुढीलप्रमाणे आहे.

"६ ) सदर निधीतून नाला, गटारे व Road Embarkment च्या आधार भिंतीची कामे करण्यात येऊ नयेत."

२. मागील काही कालावधीत मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्हयांमध्ये पावसाळयात दाट लोकवस्तीमध्ये अरुंद नाल्यांलगतच्या झोपडपट्टीतील लोकांमध्ये अतिवृष्टीमुळे आलेल्या पुरामध्ये मोठया प्रमाणात जिवित/वित्त हानीच्या दुर्दैवी घटना घडतात. त्यामुळे सदरहू नाल्यांलगत संरक्षक भिंती बांधणे आवश्यक झालेले आहे. यास्तव या विभागाच्या दि. ४ मार्च, २०१५ रोजीच्या शासन निर्णयामध्ये सुधारणा करुन त्यामधील सूचना क्रमांक ६ मध्ये उक्त बाबींचा समावेश करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार या विभागाच्या दि. ४ मार्च, २०१५ रोजीच्या शासन निर्णयामध्ये सुधारणा करुन त्यामधील सूचना क्रमांक ६ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**शासन शुध्दीपत्रक :-**

या विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पुनर्व-२०१०/प्र.क्र.१६२ (अ)/झोपनि-२, दि. ४ मार्च, २०१५ मधील मार्गदर्शक सूचना क्रमांक ६ ऐवजी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना क्रमांक ६ वाचावे.

"६ ) सदर निधीतून नाला, गटारे व Road Embarkment च्या आधार भिंतीची कामे करण्यात येऊ नयेत. तथापि, अतिवृष्टीमुळे नाल्याला येणाऱ्या पुरापासून नाल्यांलगत वसलेल्या झोपडपट्टीवासीयांचे संरक्षण होण्यासाठी संरक्षक भिंतीचे बांधकाम करण्यात यावे."

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०७१०१६५९३०९८०९ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRAVEEN D TALEKAR

Digitally signed by PRAVEEN D TALEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9718d2c8dd5ec1fd02bae9294c6516cd2f2f47a279c9208754ca3343bce01f33, pseudonym=FDABF047F75202D4DC5EBD54263D7B717E8132E5, serialNumber=4D84A2FC3DE15B99A879241D47558F1E304C138E10289D84A103D4BE3699767C, cn=PRAVEEN D TALEKAR
Date: 2023.07.11 11:19:58 +05'30'

**( प्रवीण तळेकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति :-**

१) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई-३२.
४) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई-३२.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई-३२.
६) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई.
७) जिल्हाधिकारी, मुंबई शहर व मुंबई उपगनर
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई.
९) मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ, मुंबई.
१०)निवडनस्ती-(झोपनि-२).